**संशोधन अधिकारी, सामान्य राज्यसेवा (कारागृह विभाग) गट-अ या पदावर सरळसेवेने नियुक्ती देणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांकः जेएलई-११०८/प्र.क्र.१४९/पुनर्बांधनी क्रमांक ७१/तुरुंग-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ६ जुलै, २०१८.

**संदर्भ :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांक : ५०४(५)/१६०७/आठ, दिनांक १३ नोव्हेंबर, २०१७

**प्रस्तावना:-**

अपर पोलीस महासंचालक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयांतर्गत संशोधन अधिकारी, सामान्य राज्य सेवा (कारागृह विभाग) गट-अ या संवर्गातील रिक्त पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या संदर्भाधीन पत्रान्वये शिफारस केल्यानुसार भरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संशोधन अधिकारी, सामान्य राज्य सेवा (कारागृह विभाग) गट-अ या संवर्गातील रिक्त पद भरण्याकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन पत्रान्वये डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांची शिफारस शासनास केली आहे. त्यानुसार डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांची खाली नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून संशोधन अधिकारी, सामान्य सेवा, गट-अ या संवर्गात परीविक्षाधीन कालावधीकरीता तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

२. अटी व शर्ती :-

(१) डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांचा परिविक्षाधीन कालावधी (Probation Period) हा नियुक्तीच्या पदावर रुजू झालेलया तारखेपासून दोन वर्षाचा असेल, जर ते या २ वर्षाच्या आत परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करु शकले नाहीत तर शासनाला योग्य वाटेल तेवढया कालावधीसाठी परिविक्षाधीन कालावधी वाढविण्यात येईल. तसेच सदर उमेदवार २ वर्षाच्या किंवा वाढविलेल्या परिविक्षाधीन कालावधीत विहित चाचण्या व परिक्षेत उत्तीर्ण झाले नाहीत किंवा गैरवर्तणुकीबद्दल अपराधी आढळले तर त्यांची नियुक्ती समाप्त करण्यास ते पात्र ठरतील.

(२) डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांना महाराष्ट्र कारागृह नियमावली १९७९ मध्ये नमूद केल्यानुसार विहीत नियमाप्रमाणे विभागीय परिक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. तसेच, मराठी व हिंदी भाषा परिक्षा नियमानुसार उत्तीर्ण असल्याने त्यांना सदर परिक्षा उत्तीर्ण होण्यापासुन सूट देण्यात येत आहे.

(३) डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांना परिविक्षाधीन कालावधीमध्ये वेतनबँड रु.१५६००-३९१००+ ग्रेड वेतन रु.५४०० या वेतनश्रेणीतील वेतन मिळेल. एक वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी संपल्यानंतर त्यांना वार्षिक वेतनवाढ देण्यात येईल. त्यानंतरची वेतनवाढ त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पुर्ण केल्यानंतरच शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-१३७०/डी, दि.१२ एप्रिल १९७२ नुसार देण्यात येईल.

(४) डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांनी दोन वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी किंवा त्यानंतर वाढविलेला परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पुर्ण केल्यानंतर त्यांची संशोधन अधिकारी, सामान्य राज्य सेवा (कारागृह विभाग) गट-अ संवर्गात नियमित नियुक्ती केली जाईल.

(५) डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांना शासकीय सेवेतून राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यांनी शासनास एक महिन्याची आगाऊ नोटीस द्यावी लागेल अथवा एक महिन्याचे वेतन सरकारजमा करावे लागेल.

(६) डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांनी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९ मार्च २००३ अन्वये विहित केल्यानुसार संगणक अर्हता प्राप्त केली असल्याने सदर परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून त्यांना सूट देण्यात येत आहे.

(७) डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांना शासन निर्णय वित्त विभाग अनिया-१००५/१२६/सेवा-४, दि.३१ ऑक्टोंबर २००५ मधील तरतुदीनुसार नवीन परिभाषीत अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू राहील.

(८) डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांना वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील राज्य सेवा अधिकाऱ्यांना जे सेवा विषयक सर्वसाधारण नियम लागू आहेत ते तसेच महाराष्ट्र कारागृह नियमावली १९७९ मधील नियम (स्टाफ डिसिप्लीन व स्टाफ फंक्शन) लागू होतील.

३. डॉ. हेमंतकुमार दगडू पवार यांनी या नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत पदस्थापनेसाठी अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, जुनी मध्यवर्ती इमारत, दुसरा मजला, पुणे १ यांच्या कार्यालयात रुजु व्हावे अन्यथा सदर नियुक्ती स्वीकारण्यास ते इच्छुक नाहीत असे समजून पुढील कार्यवाही करण्यात येईल. प्रथम नेमणुकीच्या पदग्रहणासाठी कराव्या लागणाऱ्या प्रवासासाठी ते प्रवासभत्ता मिळण्यास पात्र नाहीत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०६१६२१४७३२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Saguna G Thengil

Digitally signed by Saguna G Thengil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d46fe3bd37ed57f0bdb52fb3a029adc1350259 43cb93cc90de6ceb564ced5ea3, cn=Saguna G Thengil
Date: 2018.07.06 16:22:14 +05'30'

(स.ग.ठेंगिल)
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई.

२) मा.राज्यमंत्री (गृह-शहरे) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
३) मा.राज्यमंत्री (गृह, ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
५) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, पुणे.
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर/पश्चिम विभाग, पुणे/दक्षिण विभाग, मुंबई/ मध्य विभाग, औरंगाबाद/ मुख्यालय, पुणे.
११) प्राचार्य, तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविद्यालय, येरवडा, पुणे
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१४) श्री.हेमंतकुमार दगडू पवार, द्वारा.डी.एस.पवार, ४३, उत्कर्ष कॉलनी, साक्री रोड, गुरुकुल विद्यालयाशेजारी, धुळे, मु.पो.ता.जि.धुळे.
१५) निवडनस्ती, कार्यासन तुरुंग-१, गृह विभाग.